राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी रु.९०००लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-१०२१/ प्र.क्र.१७९/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: २६ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ :**

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक-कृयायो-०८१८/प्र.क्र.२३१/१४अे, दि.१२ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानातील घटक क्रमांक-३, वैयक्तिक लाभार्थी शेतकऱ्यांना कृषि औजारे/यंत्र खरेदीसाठी अनुदान देणे व घटक क्रमांक -४, कृषि औजारे/यंत्रे बँकाना अनुदान देणे या घटकांची अंमलबजावणी करावयाची आहे. सदर घटकांची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करावयाची आहे.

या योजनेसाठी सन २०२१-२२ या वर्षात रु. १५००० लक्ष तरतूद करण्यात आली होती. तथापि, वित्त विभागाच्या दि. २४ जून,२०२१ च्या शासन निर्णयानुसार ६०% च्या मर्यादेत रु.९००० लक्ष सुधारित तरतूद करण्यात आली आहे. सदर सुधारित तरतूदीन्वये रु.९००० लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

१) सन २०२१-२२ या वर्षात राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी रू.९००० लक्ष (रुपये नव्वद कोटी फक्त) रकमेच्या कार्यक्रमास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती / जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लाख यापैकी कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ४०% किंवा रु.१ लाख यापैकी कमी असेल ते या प्रमाणे अनुदान देण्यात यावे.

३) इतर बाबींसाठी योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भाधीन दि. १२ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

४) सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ नियम/परिपत्रक/अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C. तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही नियम/अधिकाराचा भंग होणार नाही याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५) राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (नि. व. गु.नि), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उद्दिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. सदर योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी भौतिक/ आर्थिक लक्षांक निर्धारीत करण्यात यावे.

६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२६१७१५०३९२०१ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHIL DADARAO KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL DADARAO KHODWEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, pseudonym=3B9A4D2FE6D1E28F48F3C36FFF2083DE6B3E68E5, serialNumber=19B0CCBEE5810AA5E36E9FA467A7630471D3C500CEB353FBB37BF0B6DFE0407A, cn=SUSHIL DADARAO KHODWEKAR
Date: 2021.10.26 17:45:31 +05'30'

**( सुशिल खोडवेकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सचिव (कृषि), मंत्रालय,मुंबई-३२
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे

७. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) मंत्रालय, मुंबई -३२
१४. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)